**राष्ट्रीय बाल स्वास्थ्य कार्यक्रमांतर्गत (आरबीएसके) ११९५ वाहने भाड्याने सेवापुरवठादारामार्फत घेण्याच्या निविदा प्रक्रियेस प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आशा-०७१८/प्र.क्र.३६८/आरोग्य-७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १४ डिसेंबर, २०२१.

वाचा :-

१) सहसंचालक (रुग्णालये), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र.राआसो/आरबीएसके वाहने/प्रशासकीय मान्यता/४९८१३-८१७/२०२१, दिनांक ३०.०८.२०२१.

२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची मान्यता प्राप्त टिप्पणी, दिनांक २१.०८.२०२१.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राज्यातील मुलांचे आरोग्य सुधारण्यासाठी सन २०१३ मध्ये राष्ट्रीय बाल स्वास्थ्य कार्यक्रमास सुरुवात केली आहे. या कार्यक्रमांतर्गत राज्यातील ०-६ वर्ष वयाच्या मुलांची वर्षातून २ वेळा आणि ६ ते १८ वर्षाच्या मुलांची वर्षातून १ वेळा डॉक्टरांचे पथकामार्फत आरोग्य तपासणी करण्यात येते.

बालकांची तपासणी करण्यासाठीच्या पथकामध्ये एक महिला वैद्यकीय अधिकारी, एक पुरुष वैद्यकीय अधिकारी, एक औषधनिर्माण अधिकारी, एक सहाय्यक परिचारिका/ प्रसाविका असे चार कर्मचारी असतात. हे कर्मचारी दररोज कार्यक्रम पत्रिकेप्रमाणे त्यांना नेमून दिलेल्या भागातील प्रत्येक शाळेस व अंगणवाडीस भेट देऊन शाळेतील/ अंगणवाडीतील सर्व बालकांची आरोग्य तपासणी करतात. याकरीता यापूर्वी सन २०१९ मध्ये आरोग्य सेवा आयुक्तालयामार्फत ३ वर्षासाठी ११९५ वाहने विहित निविदा प्रक्रिया राबवून बाह्य यंत्रणेद्वारे भाडे तत्वावर घेण्यात आली असून

त्याची मुदत दिनांक ३१.०३.२०२२ मध्ये संपुष्टात येत असल्याने यापूर्वी आरबीएसके T-Permit वाहने भाडयाने घेण्यासाठी नवीन सेवा पुरवठादारांची निवड करणे आवश्यक आहे.

त्यानुषंगाने राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत ११९५ वाहने भाड्याने सेवापुरवठादारामार्फत घेण्यासाठी नव्याने निविदा प्रक्रिया करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, आरोग्य सेवा यांनी प्रस्तावित केल्यानुसार राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय बाल स्वास्थ्य कार्यक्रमाची उद्दिष्टे साध्य करण्याच्या दृष्टीने एकूण ११९५ वाहने बाह्य यंत्रणेद्वारे ३ वर्षाकरीता भाडे तत्वावर घेण्याकरीता विहित निविदा प्रक्रिया राबविण्यास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी :-**

१) सदर वाहनांची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबीं भाडेतत्वावर घेण्यासाठी विहित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू वाहनांचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. बाह्य यंत्रणेद्वारे भाडयाने घ्यावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) सदर प्रकरणी विहित ई-निविदा प्रक्रिया/ GEM Portal, इतर राज्यांचे/ कार्यालयाचे दरकरार लक्षात घेऊन दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी

असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) सदर पुरवठा करण्यात येणारी वाहने ही आर.टी.ओ. च्या नियमाप्रमाणे T-Permit असल्याची खात्री करावी. तसेच वाहनांचा पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वाहनांचा पुरवठा होईल, याची खात्री करण्यात यावी.

६) पुरवठा करण्यात आलेले वाहने पुरवठा झाल्यानंतर त्यांचे वितरण (distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर वाहने विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदरहू खरेदीसाठी अंदाजित खर्च रु.३८६४.७७ लक्ष एकूण ११९५ इतका खर्च अपेक्षित असून सदर खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियान मंजूर पीआयपी सन २०२१-२२ नुसार उपलब्ध असलेल्या FMR Code २.२.३ Mobility support for RBSK Mobile health team या head अंतर्गत रु.३८६४.७७ लक्ष इतक्या निधीतून भागविण्यात यावा.

८) तसेच, या बाबींची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) सदर वाहने बाह्य यंत्रणेद्वारे भाडे तत्वावर घेण्याकरीता वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक ०२.०२.२०१३, दिनांक ०२.१२.२०१३ व दिनांक ०२.०८.२०१६ मधील तरतुदीची अंमलबजावणी होईल, याची खात्री करण्यात यावी.

११) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.१३ नियम क्र.६० व ६१ मधील बाबींची पूर्तता करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान

संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२३११४३१८६२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2021.12.14 17:13:48 +05'30'

**( वि. ल. लहाने )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई.
३) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४) संचालक १ व २, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई
६) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
७) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
८) उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे.
९) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
१०) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
११) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
१२) निवडनस्ती (आरोग्य-७)